मत्स्यद्योग विकास धोरण निश्चित करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१०२३/प्र.क्र. २२८/पदुम-१४**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ३ ऑगस्ट, २०२३

**प्रस्तावना :**

मत्स्यव्यवसाय विभागाचे सर्वंकष धोरण एकत्रितरित्या अस्तित्वात नाही. ज्याप्रमाणे वस्त्रोद्योग विभागाचे वस्त्रोद्योग धोरण व उद्योग विभागाचे औद्योगिक धोरण आहे. त्याप्रमाणे भूजलाशयीन आणि सागरी जिल्हयात, मत्स्योद्योग विकास धोरण निश्चित करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

भूजलाशयीन आणि सागरी जिल्हयातील मत्स्योद्योग विकास धोरण निश्चित करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती प्रस्तावित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सागरी जिल्हयातील, २ विधानसभा सदस्य | सदस्य |
| ३ | भूजल जिल्हयातील, २ विधानसभा सदस्य | सदस्य |
| ४ | सागरी जिल्हयातील, १ विधानपरिषद सदस्य | सदस्य |
| ५ | भूजल जिल्हयातील, १ विधानपरिषद सदस्य | सदस्य |
| ६ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| ७ | उप सचिव (मत्स्यव्यवसाय), मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ८ | सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (भूजल), महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ९ | सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (निमखारे), महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| १० | वैज्ञानिक, केंद्रीय मत्स्यकी अनुसंधान संस्था (CIFE), मुंबई | |
| ११ | सागरी जिल्हयातील सहकारी मच्छिमार संस्थांचे १ प्रतिनिधी | सदस्य |
| १२ | भूजल जिल्हयातील सहकारी मच्छिमार संस्थांचे १ प्रतिनिधी | सदस्य |
| १३ | केंद्रीय समुद्री मत्स्यिकी अनुसंधान संस्था (CMFRI), मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १४ | महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १५ | मत्स्यव्यवसाय क्षेत्रातील सेवाभावी संस्थांचे (NGO) २ प्रतिनिधी | सदस्य |
| १६ | सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.-

१. विविध राज्यातील योजनांचे अध्ययन करून योजनांचे प्रारूप तयार करणे. (खारे, निमखारे व गोडे पाणी)
२. जिल्हास्तरीय/ राज्यस्तरीय योजनांचे अध्ययन करून मत्स्यविकासाबाबत स्वतंत्र योजना तयार करणे.

३. सद्य:स्थितीतील अस्तित्वातील नियमात कालानुरूप आवश्यक बदल सुचविणे.

४. मत्स्यविकासाच्या अनुषंगाने पर्यावरण संतुलन राखणे व त्यावर उपाययोजना सुचविणे.

५. दुर्मिळ मत्स्य प्रजातींबद्दल संवर्धन व संरक्षण करणे.

६. पारंपारीक मासेमारी आणि त्यावर अवलंबून असलेले मच्छिमार यांच्या उपजिविकेबद्दल साधनांची उपाययोजना सुचविणे.

७. सार्वजनिक/ खाजगी भागीदारीतून जेट्टी, बंदरे यांचा विकास करणे.

८. मत्स्यव्यवसाय विषयक शैक्षणिक अभ्यासक्रम, औपचारिक अभ्यासक्रम सुचविणे तसेच प्रशिक्षण देणाऱ्या केंद्रांचा विकास करणे.

९. मासेमारी व्यावसायिकांना या क्षेत्रात उत्पादन वाढीसाठी तसेच मार्गदर्शनासाठी हेल्पलाईन सेवा सुरू करणे.

१०.मासेमारी व्यवसायाकरिता शितगृह, वाहतूक चेन, मच्छिमार व त्यांच्या कुटुंबाच्या कल्याणासाठी व सामाजिक सुरक्षेसाठी उपायोजना सुचविणे. उदा.किसान क्रेडिट कार्ड वितरीत करण्याबाबत.

११."शेत तिथे मत्स्य तळे" याची प्रभावी अंमलबजावणीकरिता उपाययोजना करणे.

१२.जिल्हा परिषद अखत्यारीत असलेल्या २० हजार जलाशयांचा मत्स्यविकास करण्याच्या दृष्टीकोनातून उपाययोजना सुचविणे.

१३. शेततळयांचा मत्स्य उत्पादन वाढीसाठी उपाययोजना करणे.

१४.भूजल जलाशय अधिनियम १९६१, मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था १९८९ व महाराष्ट्र सागरी नियमन अधिनियम २०२२ या अस्तित्वात असलेल्या अधिनियमांच्या अंमलबजावणीसाठी प्रभावी उपाययोजना सुचविणे.

१५.ICAR व इतर केंद्रीय संस्था यांच्याशी करार करून राज्यातील मत्स्यप्रजाती उत्पादनात वाढ होईल त्याविषयी उपाययोजना करणे.

१६.Ornamental Fisheries बाबत प्रचार व प्रसार करणेबाबत.

३. सदर समितीसाठी प्रवास, चहापान, भत्ता इत्यादीचा खर्च मत्स्योद्योग विकास महामंडळ यांचेमार्फत भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०४११२५१३७६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR MAHADEO JAKHATE

Digitally signed by KISHOR MAHADEO JAKHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=83112e1445917d0a21fbab36d7c0ff41e09863c93a2e62ea1b0c01da16b7a161, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=032A6ACBFD529D66DD76E26EAB14B28C6DD07D2F776E529B44BA2CB45324C503, cn=KISHOR MAHADEO JAKHATE
Date: 2023.08.04 11:28:49 +05'30'

**( कि.म.जकाते )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे प्रधान सचिव

३. मा. मंत्री / राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव (सर्व)

४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

५. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. वैज्ञानिक, केंद्रीय मत्स्यकी अनुसंधान संस्था (CIFE), मुंबई

७. केंद्रीय समुद्री मत्स्यिकी अनुसंधान संस्था (CMFRI), मुंबई

८. महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर

९. सहआयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी/ भूजल/ निमखारे), महाराष्ट्र राज्य, मुंबई

१०. प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय विभाग (सर्व)

११. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय (सर्व)

१२. निवडनस्ती.